**शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देण्याबाबतचे अधिकार जिल्हाधिकारी यांना प्रत्यायोजित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१५/प्र.क्र.४५/ज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: **१ जून, २०१५.**

वाचा:-

१. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.जमीन-१०/२००५/प्र.क्र.३७/ज-१, दि. ७.४.२००५.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जमीन-१०/२००५/प्र.क्र.३८/ज-१, दि.७.३.२००६.
३. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.जमीन-०५/२००८/प्र.क्र.८८/ज-१,दि. १८.६.२०११.
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जमीन-०५/२०११/प्र.क्र.९०/ज-१, दि. २७.०७.२०११ व शुध्दीपत्रक दि. १७.१०.२०११.
५.शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.जमीन-०९/२०१२/प्र.क्र.७९/ज-१,दि. ३०.११.२०१२.
६.शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.जमीन-०५/२०११/प्र.क्र.९०/ज-१, दि.१३.०६.२०१३.
७. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जमीन-०९/२०१२/प्र.क्र.७९/ज-१, दि.०२.०७.२०१३

प्रस्तावना :-

शासन परिपत्रक क्र.एलएनडी-१०७१/१८३७३६/एआयआय, दिनांक ९ सप्टेंबर, १९७१ व दिनांक २५ फेब्रुवारी, १९७२ आणि क्रमांक जमीन ४९७९/२९९०४/सी.आर.५३४/ग-८, दिनांक १० मार्च, १९८६ अन्वये राज्याच्या इतर विभागास विशिष्ट प्रयोजनासाठी शासकीय जमीन आवश्यक असल्यास, जिल्हाधिकारी यांनी अशी जमीन हस्तांतरीत करावी असे निर्देश देण्यात आले होते.

नंतर,महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र.जमीन-१०/२००५/प्र.क्र.३७/ज-१, दिनांक ७ एप्रिल, २००५ अन्वये, " सदर भूमिकेचे पुनर्विलोकन होऊन नव्याने आदेश प्राप्त होईपर्यंत जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांनी शासकीय जमिनीचा शासनाच्या पूर्व मंजूरीशिवाय आगाऊ ताबा कुठल्याही प्रयोजनासाठी, कोणत्याही प्रकरणात (शासनाचे इतर विभागासहीत) देऊ नये आणि जमीन वाटपाचा प्रस्ताव त्यांच्या शिफारशीसह शासनाकडे सादर करावा," अशा सुचना देण्यात आल्या होत्या. तदनंतर शासन निर्णय, क्रमांक जमीन-१०/२००५/प्र.क्र.३८/ज-१, दिनांक ७ मार्च, २००६ अन्वये उपरोक्त सूचना रद्द करण्यात येऊन काही अपवादात्मक प्रकरणात नगरपरिषद हद्दीतील शासकीय जमीनीचा आगाऊ ताबा राज्यशासन/केंद्र शासनाच्या विविध विभागांना/उपक्रमांना देण्याबाबतचे अधिकार जिल्हाधिकारी यांना प्रत्यायोजित करण्यात आले.

०२. तदनंतर,जमीन उपलब्धतेची तातडी व निकड लक्षात घेऊन विवक्षित प्रयोजनांसाठी शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना प्रदान करण्याचे आदेश वेळोवेळी निर्गमित करण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे संदर्भीय क्र.४ वरील शासन निर्णय दिनांक २७.७.२०११ व संदर्भीय क्र.३,५

व ६ वरील शासन परिपत्रक दि. १८.६.२०११, ३०.११.२०१२ व ३०.६.२०१३ अन्वये यासंदर्भात स्पष्टीकरणात्मक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. अशा सूचना निर्गमित करत असताना, महानगरपालिका क्षेत्र वगळून उर्वरित क्षेत्रातील शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना देण्यात आलेले आहेत. तथापि, महानगर पालिका (बृहन्मुंबई महानगरपालिकेसह) हद्दीतील शासकीय प्रकल्प तसेच विकास आराखडयातील सार्वजनिक सुविधा व सार्वजनिक प्रयोजन या स्वरुपाच्या विविध आरक्षाणाखाली येणा-या, शासकीय जमीनी वेळीच उपलब्ध करुन न दिल्यास कालापव्यय होऊन शासकीय कार्यक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये विलंब होऊ शकतो व अशा परिस्थितीत अर्थसंकल्पात केलेल्या तरतूदीचा वेळेत वापर न होता ती अखर्चित पडून राहू शकते किंवा परत करण्याची वेळ येवू शकते. तसेच, अशी कामे वेळेत पूर्ण होण्यास अडचणी निर्माण होऊ शकतात व तसे झाल्यास प्रकल्पाच्या अंदाजपत्रकीय खर्चात वाढ होऊ शकते किंवा अशा प्रसंगी शासनाचे अनुदान व्यपगत होऊ शकते. ही वस्तुस्थिती विचारात घेऊन बृहन्मुंबईसह सर्व महानगरपालिका क्षेत्रात शासकीय जमीनीचा आगाऊ ताबा देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी/विभागीय आयुक्त यांना देण्याची मागणी क्षेत्रिय स्तरावरुन करण्यात येत होती. सबब, या सर्व बाबींचा सर्वकष विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

राज्य शासनाच्या प्रशासकीय विभागांना शासकीय योजना/प्रकल्प/इमारती यासाठी शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देण्यासंदर्भात वेळोवेळी संदर्भाधीन शासन निर्णय/परिपत्रक निर्गमित केलेले असून शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जमीन १०/२००५/प्र.क्र.३८/ज-१, दिनांक ७.३.२००६ मधील परिच्छेद ३ मध्ये "महानगरपालिकेच्या क्षेत्रातील विकास आराखड्यात कोणत्याही प्रयोजनासाठी आरक्षित असलेल्या शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय महानगरपालिकेस अथवा राज्य व केंद्र शासनाच्या कोणत्याही विभागास/उपक्रमास वा अन्य संस्थेस देण्यात येऊ नये." असे निर्देश देण्यात आलेले आहेत. हे निर्देश या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत असून, सदर दि.७.३.२००६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-२ (ट) येथे नमूद तरतूद महानगरपालिका क्षेत्रातील शासनमान्य विकास आराखड्यातील आरक्षित शासकीय जमिंनीस ही लागू करण्यात येत आहे. त्यास अधिन राहून, बृहन्मुंबईसह राज्यातील सर्व महानगरपालिका क्षेत्रातील शासनमान्य विकास आराखड्यातील विविध सार्वजनिक सुविधा व सार्वजनिक प्रयोजनाशी निगडीत आरक्षणाखालील शासकीय जमीनीचा आगाऊ ताबा राज्य शासनाच्या संबंधित प्रशासकीय विभाग, संबंधित विकास प्राधिकरण/स्थानिक प्राधिकरण इत्यादींना देण्याचे अधिकार संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना या शासन निर्णयाद्वारे प्रदान करण्यात येत आहेत.

त्याचप्रमाणे,शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या प्रकल्पासाठी आवश्यक शासकीय जमीन निर्बाध्यरित्या वाटपास उपलब्ध असल्यास, अशा शासकीय जमीनीचा, आगाऊ ताबा, राज्य शासनाच्या संबंधित प्रशासकीय विभाग, संबंधित विकास प्राधिकरण/स्थानिक प्राधिकरण इत्यादींना देण्याचे अधिकार ही संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना या शासन निर्णयाद्वारे प्रदान करण्यात येत आहेत.

०२. राज्य शासनाच्या संबंधित प्रशासकीय विभाग यांना किंवा यथास्थिती संबंधित विकास प्राधिकरण/ स्थानिक प्राधिकरण शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देताना, संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या धोरणानुसार अशा जमिनीचे भोगवटा मूल्य वसूल करुनच आगाऊ ताबा देण्यात यावा. मात्र, शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या प्रकल्पांसाठी आवश्यक शासकिय जमिनीचा आगाऊ ताबा देताना संबंधित प्रकल्पाच्या प्रशासकीय मान्यतेच्या आदेशातील जमीनीचे भोगवटामूल्य व इतर बाबींशी संबंधित अटी व शर्तीनुसारच आगाऊ ताबा देण्यात यावा. तसेच संबंधित शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा दिल्यानंतर, सदर जमिन नियमितपणे प्रदान करण्याविषयक प्रस्तावास जिल्हाधिकारी यांनी शासनाची रीतसर मान्यता घेणे आवश्यक राहील.

०३. मात्र, अशासकीय / खाजगी / धर्मादाय संस्थामार्फत चालविल्या जाणाऱ्या योजना / प्रयोजन / उपक्रमांसाठी शासकीय जमीनीचा आगाऊ ताबा देण्यात येवू नये.

०४. सदर शासन निर्णय नगर विकास विभाग व वित्त विभागाशी विचारविनिमय करून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०६०११७५३३२५९१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manukumar Srivastava

Digitally signed by Manukumar Srivastava
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=110001, st=NEW DELHI, cn=Manukumar Srivastava
Date: 2015.06.09 19:07:07 +05'30'

**मनु कुमार श्रीवास्तव**
**प्रधान सचिव (महसूल)**

प्रत,

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव
४) मा.मंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

७) मा. अपर मुख्य सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग , मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग , मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
११) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमीअभिलेख, पुणे.
१२) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१४) सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१६) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१९) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
२०) सर्व सहसचिव/उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) सर्व “ज” समूह कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) निवडनस्ती (कार्यासन ज-१)